**श्री. राजकुमार आनंद वर्धेकर (बागडी), उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांच्या सेवा समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी ०६२४/प्र. क्र.१३१/परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १६ ऑगस्ट, २०२४

**प्रस्तावना** - श्री. राजकुमार आनंद वर्धेकर (बागडी), उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचा जन्मदिनांकामध्ये दुरुस्ती करणेबाबतचा अर्ज प्रादेशिक परिवहन अधिकारी, प्रादेशिक परिवहन कार्यालय, अमरावती यांनी दि. २३.१२.२०२२ च्या पत्रान्वये परिवहन आयुक्त यांना सादर केला. श्री. राजकुमार आनंद वर्धेकर (बागडी) यांच्या जन्मदिनांकामध्ये सुधारणा करणेबाबत परिवहन आयुक्त कार्यालयास प्राप्त संदर्भ तसेच वर्तमानपत्रांमध्ये श्री. वर्धेकर, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे जन्मदिनांकाबाबत प्रसिध्द बातम्यांच्या अनुषंगाने श्री. राजकुमार वर्धेकर, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे अचूक जन्मदिनांकाची शहानिशा/खातरमजा करणेकरिता परिवहन आयुक्त कार्यालयाच्या दिनांक ०८.०४.२०२४ च्या आदेशान्वये श्री. विद्यासागर हिरमुखे, उप आयुक्त (लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांची एकसदस्यीय समिती गठित करण्यात आली होती.

२. श्री. वर्धेकर, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची प्रथम नियुक्ती उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, वर्धा येथे झाली असल्यामुळे त्यांचा शाळा सोडल्याचा दाखला, कॉलेज सोडल्याचा दाखला व बोर्ड प्रमाणपत्राची तपासणी करून अहवाल सादर करणेबाबत प्रादेशिक परिवहन कार्यालय, वर्धा यांना व सदर सेवापुस्तकामध्ये नागपूर महानगरपालिका कार्यालयाचे जन्म प्रमाणपत्र जोडण्यात आले असल्यामुळे तसेच जिल्हाधिकारी कार्यालयाचे अधिवास प्रमाणपत्र जोडण्यात आले असल्यामुळे सदर प्रमाणपत्रांची सत्यता पडताळणीसाठी प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (शहर) यांना सदर एकसदस्यीय समितीमार्फत कळविण्यात आले. श्री. वर्धेकर, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचेशी भ्रमण दुरध्वनीवरुन संपर्क साधण्याचा प्रयत्न केला असता त्यांनी प्रतिसाद न दिल्यामुळे त्यांना त्यांचे मूळ जन्मदाखला, शाळा सोडल्याच्या दाखल्याची मूळ प्रत, १० वी व १२ वी ची मूळ प्रमाणपत्रे घेऊन दिनांक १८.०४.२०२४ रोजी प्रादेशिक परिवहन कार्यालय, अमरावती येथे हजर राहण्याबाबत पत्राद्वारे निर्देशित केले. तथापि ते त्या दिवशी समितीसमोर हजर झाले नाहीत.

३. सदर प्रकरणी उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, वर्धा, प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (शहर) यांचेकडून प्राप्त अहवालाआधारे सदर एकसदस्यीय समितीने श्री. वर्धेकर, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे जन्मदिनांकाबाबतचा सत्यता पडताळणी अहवाल

परिवहन आयुक्त यांना सादर केला. या अहवालाआधारे परिवहन आयुक्त कार्यालयाने खालीलप्रमाणे निष्कर्ष शासनास कळविले आहेत :-

१) प्रस्तुत अहवालावरून श्री. राजकुमार वर्धेकर यांचा जन्म दिनांक २२.०९.१९६४ असा असल्याचे सिध्द होते.

२) श्री. वर्धेकर यांचा खरा जन्म दिनांक २२.०९.१९६४ असा असूनही त्यांचा उप प्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गाच्या दिनांक ०१.०१.२०१८ ते दिनांक ०१.०१.२०२२ रोजीच्या सेवाज्येष्ठता यादीत नमूद जन्म दिनांक २२.०९.१९६६ ऐवजी २२.०९.१९६५ करणे संदर्भात सादर केलेली सर्व कागदपत्रे बनावट असल्याची तसेच सदर बनावट कागदपत्रे परिवहन आयुक्त कार्यालयास व शासनास सादर करून दिशाभूल व फसवणूक केली.

३) श्री. वर्धेकर यांचा जन्म दिनांक २२.०९.१९६४ असल्याचे सिध्द झाल्याने ते दिनांक ३०.०९.२०२२ रोजी सेवानिवृत्त होणे अपेक्षित होते. परंतु त्यांचे सेवापुस्तकात खाडाखोड तसेच जन्म दिनांक २२.०९.१९६५, २२.०९.१९६६ असल्याबाबत केलेली निवेदने व जोडलेली कागदपत्रे यामुळे अद्याप सेवानिवृत्त केले नाही. त्यामुळे शासनाची आर्थिक फसवणूक झाल्याची बाब निदर्शनास येते.

४. महाराष्ट्र नागरी सेवा नियम, १९८१ (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) मधील नियम क्र. ३८ (एफ) मध्ये नमूद तरतूदी व सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक दि.०३.०३.१९९८ अन्वये शासन सेवेत प्रवेश केल्यापासून ०५ वर्षाच्या आत जन्मतारखेत बदल करण्यासाठी उमेदवाराने अर्ज करणे आवश्यक आहे. त्याबाबतचा अर्ज श्री. राजकुमार वर्धेकर यांनी शासनास सादर केल्याचे दिसून येत नाही.

५. श्री. वर्धेकर, उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचा जन्म दिनांक २२.०९.१९६४ असल्याचे सिध्द झाल्याने ते दि. ३०.०९.२०२२ रोजी सेवानिवृत्त होणे अपेक्षित होते. परंतु त्यांचे सेवापुस्तकात खाडाखोड तसेच जन्म दिनांक २२.०९.१९६५, २२.०९.१९६६ असल्याबाबत केलेली निवेदने व जोडलेली कागदपत्रे यामुळे अद्याप सेवानिवृत्त केले नाही. त्यामुळे शासनाची आर्थिक फसवणूक झाल्याचे तसेच त्यांनी शासनास बोगस कागदपत्रे सादर करुन शासनाची दिशाभूल केल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे त्यांची सेवा समाप्त करण्याबाबत सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय** - श्री राजकुमार आनंद वर्धेकर (बागडी), उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचा जन्म दिनांक २२.०९.१९६४ असल्याचे सिध्द झाल्याने ते दि. ३०.०९.२०२२ रोजी सेवानिवृत्त होणे अपेक्षित होते. परंतु त्यांचे सेवापुस्तकात खाडाखोड तसेच जन्म दिनांक २२.०९.१९६५ व २२.०९.१९६६ असल्याबाबत केलेली निवेदने व जोडलेली कागदपत्रे यामुळे त्यांना अद्याप सेवानिवृत्त केले नाही. परिणामी शासनाची आर्थिक फसवणूक झाल्याचे तसेच

बोगस कागदपत्रे सादर करुन त्यांनी शासनाची दिशाभूल केल्याचे सिद्ध झाले असल्याने त्यांच्या सेवा याव्दारे समाप्त करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१६१८०३२०६२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2024.08.16 18:18:22 +05'30'

**( सु. बा. आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. परिवहन उप आयुक्त (प्रशासन),परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई.
३. श्री राजकुमार आनंद वर्धेकर (बागडी), उप प्रादेशिक परिवहन अधिकारी (प. आयुक्त यांचे मार्फत)
४. निवडनस्ती, परि-४

**प्रत माहितीसाठी,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
२. अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
३.सह सचिव (परिवहन), गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.